**अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे** या मंडळ कार्यालयाचे प्रशासकीय नियंत्रण **मुख्य अभियंता, कोयना प्रकल्प, पुणे** या प्रादेशिक कार्यालयाकडे ठेवण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांक-आढावा-२०१०/(४१/२०१०)/आ.(प्रशि)
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : ०८ जानेवारी, २०१०.

**वाचा :-** शासन निर्णय, पाटबंधारे विभाग क्र. संकीर्ण १२०४/(१७६/२००४)/जवि, दि.२१ जुलै, २००४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाकडील सिंचन व्यवस्थापन, प्रकल्प अन्वेषण, गुणनियंत्रण या कार्यप्रकारातील आस्थापना शासन निर्णय क्र.संकीर्ण २००४/(२०२/०४)/जसंनि, दिनांक २८.६.२००४ अन्वये दिनांक १.७.२००४ रोजी शासनाकडे वर्ग झाल्यानंतर कार्यकारी अभियंता, जलविद्युत अन्वेषण विभाग, पुणे या कार्यालयांचे नियंत्रण अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ यांच्याकडे सोपविण्यात आले. तसेच या मंडळाकडे लघु जलविद्युत प्रकल्पाचे अन्वेषण, प्रकल्प अहवाल तयार करणे, प्रकल्प अहवाल तपासणे इ. कामे सोपविण्यात आली. त्याचबरोबर काळ, कुंभे जलविद्युत प्रकल्पाच्या संकल्पनाचे कामही या मंडळाकडे सोपविण्यात आले होते. मंडळाकडील कामाची व्याप्ती ही केवळ कोयना व घाटघर प्रकल्पापूरती मर्यादित राहिली नसल्यामुळे अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे हे कार्यालय मुख्य अभियंता, जलसंपदा व सहसचिव यांच्या तांत्रिक व प्रशासकीय नियंत्रणाखाली कार्यरत राहील असे आदेश दिनांक २१.७.२००४ अन्वये निर्गमित करण्यात आले आहेत.

सद्यःस्थितीत अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे या कार्यालयाकडे कोयना प्रकल्पाच्या संकल्पचित्रविषयक कामे आहेत. त्याचप्रमाणे मुख्य अभियंता, कोयना प्रकल्प, पुणे यांचे अंतर्गत कोयना प्रकल्प सं्बधिच्या सर्व प्रशासकिय कामाचे नियंत्रण करण्यात येते. यास्तव प्रशासकीय नियंत्रणाच्या दृष्टीकोनातून कोयना प्रकल्पाच्या एकंदरीत कामकाजात सुसुत्रता येण्याकरिता अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे या मंडळ कार्यालयाचे प्रशासकीय नियंत्रण मुख्य अभियंता, कोयना प्रकल्प, पुणे यांच्याकडे ठेवण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

(कृ.मा.प.)

**शासन निर्णय :-**

शासनाच्या थेट नियंत्रणाखालील अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे हे मंडळ कार्यालय मुख्य अभियंता, कोयना प्रकल्प, पुणे यांचे प्रशासकीय नियंत्रणाखाली जोडण्यात येत आहे.

हे आदेश शासन निर्णय, क्र. वित्त विभाग क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दि.१५/१०/९२ मधील तरतूदीनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमाक २०१००२०८१३५७३४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(शुभांगी आगाशे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
मुख्य अभियंता, कोयना प्रकल्प, पुणे
अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे
सर्व अधीक्षक अभियंता व परिमंडळीय अधिकारी.
सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
संगणक कार्यक्रम कक्ष , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
(कार्यालयांचे बदलाबाबत आवश्यक ती नोंद घ्यावी)
कार्यासन आस्थापना (प्रशिक्षण), संग्रहार्थ
निवड नस्ती धारिका.